महाराष्ट्र लॉटरीच्या विविध सोडतींचे
तिकीट छपाईचे सुधारित दर लागू करणे
बाबत.

# महाराष्ट्र शासन

वित्त विभाग

**शासन निर्णय क्रमांकः मरालॉ २०१४/ प्र.क्र.९६ / लॉटरी-२**

नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मंत्रालयासमोर, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १० डिसेंबर,२०१४.

**वाचा :**

मे. साई सिक्युरिटी प्रिंटरर्स प्रा. ली, फरिदाबाद व मे. रूची सिक्युरिटी प्रिंटरर्स प्रा. ली, भोपाळ यांचे सोबत दि.१६/१०/२०१४ रोजी करण्यात आलेले करार.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्य लॉटरीची सुरूवात दि.१२ एप्रिल,१९६९ पासून झाली. राज्यातील जनतेमध्ये असलेल्या जुगार, मटका इत्यादी वाईट सवयींपासून परावृत्त करण्यासाठी शासनाने राज्यात लॉटरीची सुरूवात केली. राज्यात राबविण्यात येणाऱ्या विविध लॉटरी योजनांपासून प्राप्त होणारा महसूल राज्याच्या सर्वांगीण विकासासाठी उपयोगात आणण्यात येतो त्याच प्रमाणे या व्यावसायामुळे राज्यात रोजगार निर्मिती देखील मोठया प्रमाणावर होत आहे. राज्यात केंद्रशासनाचे सन १९९८चे अधिनियम व सन २०१० च्या नियमानुसार विविध लॉटरीच्या सोडती काढण्यात येतात. या सोडतींची तिकीटे प्रचलित अधिनियम / नियमांमधील नमूद तरतुदींनुसार रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया (RBI) किंवा इंडियान बँक असोसिएशन (IBA) यांच्या मान्यताप्राप्त यादीवरील प्रतिभूती मुद्रणालयाकडून मुद्रीत करून घेणे बंधनकारक आहे.

महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या विविध सोडतींच्या तिकीट छपाईसाठी सन २०११ मध्ये करार करण्यात आले होते. या करारांची मुदत संपुष्टात आल्याने या बाबीसाठी रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया (RBI) किंवा इंडियान बँक असोसिएशन (IBA) यांच्या मान्यताप्राप्त यादीवरील प्रतिभूती मुद्रणालयाकडून लॉटरी तिकीटे छपाई करून घेण्यासाठी करार करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचारधीन होता.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या पारंपारिक, नवीन पारंपारिक, मिनी, मासिक , भव्यतम तसेच इतर लॉटरीं सोडतींच्या तिकीट छपाईसाठी मे. साई सिक्युरिटी प्रिंटरर्स प्रा. ली, फरिदाबाद व मे. रूची सिक्युरिटी प्रिंटरर्स प्रा. ली, भोपाळ यांचे सोबत दि.१६/१०/२०१४ रोजी करार करण्यात आले आहेत. या करारातील कलम ३६ अन्वये खालील प्रमाणे सुधारित तिकीट छपाईच्या दरास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| तिकीटाचे आकारमान बारकोडसह | कागदाचा दर्जा | तिकीट छपाईचे दर (प्रती लाख तिकीटे ) (रूपयात) |
|---|---|---|
| १ चौरस सेंटीमिटर | ७० जीएसएम पोस्टर पेपर | १५६.००/- |
| | ८० जीएसएम पोस्टर पेपर | १७०.५३/- |
| | १०० जीएसएम पोस्टर पेपर | १९७.००/- |
| | ९० जीएसएम क्रोमा आर्ट पेपर | २०४.००/- |
| | १३० जीएसएम इंडियन आर्ट पेपर | २२९.००/- |
| | ७० जीएसएम मॅपलेथो पेपर | १५१.००/- |
| | ८० जीएसएम मॅपलेथो पेपर | १७९.००/- |
| | १२० जीएसएम मॅपलेथो पेपर | २०६.००/- |

२. वरील दर दिनांक १६/१०/२०१४ पासून लागू होतील.

३. या वरील खर्च मागणी क्र. जी-२, २०७५, संकीर्ण सर्वसाधारण सेवा (००) १०३ राज्य लॉटरी, लॉटरी संचालनालय (२०७५ ०४७२) (००) (०१) प्रमुख लॉटरी १६ प्रकाशने या लेखाशिर्षा मधील उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. सदरचा शासन निर्णय अपर मुख्य सचिव (वित्त ) यांचेकडून दिनांक ०२/७/२०१४ रोजी देण्यात आलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२१११२२६१११७०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJPUT
AJITSINGH
RAMSINGH

Digitally signed by RAJPUT AJITSINGH RAMSINGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SMALL SAVING AND LOTTERIES,CID - 918078, postalCode=400032, st=Maharashtra, cn=RAJPUT AJITSINGH RAMSINGH
Date: 2014.12.11 12:34:22 +05'30'

**(अ.रा. राजपुत )**
कार्यासन अधिकारी, वित्त विभाग,
तथा राज्य लॉटरी अधिकारी.

**प्रत,**

१. मा. मंत्री, वित्त, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२. मा. मंत्री , गृह, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री, वित्त, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
४. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
६. पोलीस महासंचालक (कायदा व सुव्यवस्था) मुंबई यांचे स्वीय सहायक.

७. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-२१.
८. आयुक्त, अल्पबचत व राज्य लॉटरी, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक.
९. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१०.महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक.
११. सह सचिव,राज्य लॉटरी यांचे स्वीय सहायक.
१२.उप संचालक,राज्य लॉटरी तथा अवर सचिव, वित्त विभाग, लॉटरी संचालनालय,मुंबई.
१३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-५१.
१४.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१५.उपसंचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पूर्व) मुंबई १५.
१६.कक्ष अधिकारी, प्रशा-४, वित्त, मंत्रालय, मुंबई
१७.राज्य लॉटरी अधिकारी (लॉटरी-३) व लेखा अधिकारी,महाराष्ट्र राज्य लॉटरी, मुंबई ३२.
१८. निवड नस्ती, लॉटरी -२.